# अनोळखी मित्र



कमबीझ् काकावांड
भाषांतर : शरद महाबळ
चित्रकार : फतेमह परदाख्ती

ज्योत्स्ना प्रकाशन

# अनोळखी मित्र

मूळ लेखक : कमबीझ् काकावांड
मराठी भाषांतर : शरद महाबळ
चित्रकार : फतेमह परदाख्ती



ज्योत्स्ना प्रकाशन



Originally published as:
Dostani Ke Yek Digar Ra Nashenakhtand
Author: Kambiz Kakavand


मराठी आवृत्ती : अनोळखी मित्र
प्रकाशक : मिलिंद ल. परांजपे, ज्योत्स्ना प्रकाशन
'धवलगिरी', ४३०-३१ शनिवार पेठ, पुणे ४११०३०
मुंबई ऑफिस : मोहन बिल्डिंग, १६२ ज.शंकरशेठ मार्ग, गिरगाव, मुंबई ४००००४

पहिली आवृत्ती : सप्टेंबर २००७
मुद्रक : रिच प्रिंटस्, २७२ नारायण पेठ, पुणे ४११०३०
मूल्य रुपये ३०/-    ISBN 81-7925-167-6

एकदा एक चतुर आपल्या आईबरोबर उडत होता. त्याला एक अळी दिसली. तो आईला म्हणाला, 'त्या झाडावरची ती पांढरी अळी किती छान आहे नाही!' आई म्हणाली, 'अरे, ती अळी नाही, तो सुरवंट आहे.'

मग उडत उडत ते पुढे गेले.

सुरवंटाने त्यांचं बोलणं ऐकलं. लगेच तो सगळ्यात खालच्या फांदीवर गेला. खाली पाणी होतं. एका पानाच्या अगदी कडेला बसून त्याने आपलं प्रतिबिंब पाण्यात पाहिलं. तेव्हापासून आपलं खाणं संपलं की लगेच तो तिथे येऊन बसत असे. आपण कसे दिसतो हे तो पाहत राही.



सुरवंट राहायचा ते झाड एका छोट्या तळ्याकाठी होतं, आणि तळं होतं नदीच्या अगदी जवळ. नदीतलं पाणी एका मोठ्या खड्ड्यात साठूनच ते तळं तयार झालं होतं.

नदीच्या काठावर नाना प्रकारचे प्राणी राहत असत. तिथे बेडूक होते, सरडे होते, झाडांवर रंगीबेरंगी पक्षी होते; आणि मधमाश्या, भुंगे, चतुर, फुलपाखरं, डास असे लहानमोठे कीटकही पुष्कळ होते. नदीकाठी त्यांचा खूप गोंगाट चालायचा.



एक दिवस नेहमीप्रमाणे सुरवंटाने एका मोठ्या पानाचा फन्ना उडवला आणि आपले प्रतिबिंब पाण्यात पाहायला तो खाली येऊ लागला. पण आत्तापर्यंत तो खाऊन खाऊन टम्म फुगला होता. त्याच्या वजनाने तो बसलेलं पान तुटलं आणि तो डुबकन तळ्याच्या पाण्यात पडला. त्याने पाण्यात खूप धडपड केली. आपले सगळे पाय तो जोराजोरानं हलवू लागला. शेवटी कसाबसा तो एकदाचा पाण्याच्यावर आला. वर आल्यावर तो मोठ्यानं ओरडू लागला, 'वाचवाऽऽऽ मला वाचवाऽऽऽ!'



पण थकून तो पुन्हा खाली जाऊ लागला. आता तो बुडणारच होता, तेवढ्यात त्याच्या लक्षात आलं आपल्याला कुणीतरी काठाच्या दिशेनं ढकलत आहे. काठाशी पोचताच तो मोठ्या कष्टानं पाण्यातून तीरावर चढला. जरा बरं वाटल्यावर त्याने तळ्याकडे पाहिलं. पाण्यात एक छोटा काळा मासा पोहत होता. सुरवंट आपल्याकडे पाहत आहे हे लक्षात आल्यावर माशानं पाण्यातून डोकं वर काढलं आणि तिथूनच ओरडून विचारलं, 'काय मित्रा, कसं वाटतंय आता?'



सुरवंटाने जरा दम टाकला आणि म्हणाला, 'हो-हो. आता ठीक आहे. मला वाचवणारा तो तूच का?'

मासा आपली शेपटी हलवत पोहत काठाशी आला. म्हणाला, 'तू पाण्यात पडला होतास आणि मदतीसाठी हाका मारत होतास, ते मी ऐकलं. मग मी तुला काठावर पोचायला मदत केली, एवढंच.'

सुरवंटाने आभार मानण्यासाठी आपली मान झुकवली. तो म्हणाला, 'तू माझा जीव वाचवलास. मला मित्रही म्हणालास. तू खूप चांगला आहेस. पण मला तुझं नाव ठाऊक नाही.'



काळा मासा हळू आवाजात म्हणाला, 'मला टॅडपोल म्हणतात.'

तेव्हापासून ते दोघं एकमेकांचे जिवलग मित्र बनले. आपआपलं खाणं झालं की दोघंही काठावर येऊन गप्पा मारत. सुरवंट आपण झाडावरून काय-काय पाहिलं ते टॅडपोलला सांगायचा. टॅडपोलही तळ्याच्या पाण्यात पोहता पोहता आपल्या आईकडून ऐकलेल्या निरनिराळ्या गोष्टी सुरवंटाला सांगायचा.

दिवसेंदिवस त्यांची दोस्ती अधिक दाट होत होती. असे बरेच दिवस गेले.



हळूहळू हवेतील उकाडा वाढू लागला तशी नदीतली पाण्याची पातळी खाली खाली जाऊ लागली. मग टॅडपोलच्या लक्षात आलं की आपलं तळं आता नदीपासून वेगळं झालं आहे. त्याला चांगलीच काळजी पडली. हवा जर अशीच तापत राहिली तर तळ्याच्या साऱ्या पाण्याची हळूहळू वाफ होऊन जाईल आणि पाण्याबरोबरच आपलाही शेवट होईल.

रोज तळ्यातलं पाणी आणखी आणखी कमी होत होतं. अखेर तळं अगदी तळहाताएवढं लहान झालं, आणि जेमतेम तेवढंच खोलगट. आता टॅडपोलची अगदी घाबरगुंडी उडाली. त्याने पाण्याबाहेर डोकं काढून हाक मारली, 'मित्रा कुठं आहेस तू?'



खाऊन खाऊन लठ्ठ झालेला सुरवंट आणखी एका पानाचे शेवटचे तुकडे खाण्यात गर्क होता. त्याला आपलं वजनदार शरीर घेऊन हालचाल करणंही आता अवघड झालं होतं. तो कसाबसा तळ्याकाठी येऊन म्हणाला, 'काय झालं मित्रा, कशाला हाक मारलीस?'

टॅडपोल म्हणाला, 'अरे, तळ्यातलं पाणी बघ ना किती संपत आलं आहे. मी जर एक-दोन दिवसांत नदी गाठली नाही तर या तळ्याबरोबरच सुकून मरून जाईन. काहीतरी करून मला वाचव.'

आपल्या मित्राला कसं वाचवता येईल याचा सुरवंटाने खूप विचार केला, पण त्याला काही सुचेना. अंधार पडल्यावर त्या दोघांनी एकमेकांचा निरोप घेतला. पण सुरवंटाला रात्रभर झोप लागली नाही. रात्री सगळा वेळ तो एकसारखा विचार करीत होता. अखेर पहाटे त्याला एक छान कल्पना सुचली.

सुरवंट झाडावरून उतरून तळ्यालगतच्या उंच गवताशी गेला तेव्हा टॅडपोल अजून झोपेत होता. सुरवंटाने गवताचं एक लांबलचक पातं कापलं आणि ते घेऊन तो तळ्याच्या वरच्या भागावर असलेल्या एका फांदीवर चढला. मग त्याने टॅडपोलला हाक मारली, 'मित्रा, ऊठ!'

सुरवंटाचा आवाज ऐकून टॅडपोल जागा झाला.

सुरवंटाने त्याला गवताचं टोक दाखवलं. तो म्हणाला, 'हे तुझ्याकडचं टोक दातात गच्च धर, अजिबात सोडू नको.'

मग टॅडपोलने गवताचं टोक तोंडात गच्च धरलं. सुरवंटाने मग ते गवताचं पातं त्याला लटकलेल्या टॅडपोलसकट ओढत ओढत नदीच्या वरच्या भागावर असलेल्या फांदीपर्यंत नेलं. जाताना टॅडपोल हवेत इकडेतिकडे वळवळ करत होता. नदीवरच्या फांदीवर पोचताच सुरवंटाने गवताचं टोक तोंडातून सोडून दिलं. तसा टॅडपोल खाली नदीमध्ये पडला आणि नदीच्या प्रवाहाबरोबर दिसेनासा झाला.



लवकरच सुरवंट कोषात गेला. काही दिवसांनी जेव्हा तो कोषातून बाहेर आला तेव्हा त्याला पंख फुटले होते. तो उडत उडत नदीवर गेला. त्याला पाण्यात आपलं प्रतिबिंब पाहायचं होतं. पाण्यात पाहिल्यावर त्याला आश्चर्याचा धक्काच बसला. तो म्हणाला, 'केवढा बदललो आहे मी!'

तो आता लठ्ठ पांढरा सुरवंट नव्हता. त्याला लाल रंगाचे सुरेख पंख होते, एका छान फुलपाखरात त्याचं रूपांतर झालं होतं. फुलपाखराला आता आपल्या मित्राची आठवण झाली. त्याला शोधण्यासाठी ते नदीवर उडू लागलं. नदीत सगळीकडे बघून झालं, पण त्याला काही तो छोटा काळा मासा कुठे दिसला नाही. नदीत छोटे छोटे बेडूक मात्र खूप दिसत होते. ते पाण्यात उड्या तरी मारत होते नाहीतर नदीकाठी बसून डराँव डराँव ओरडत होते. त्यांचा आवाज सगळीकडे भरला होता.



फुलपाखराने पुन्हा एकदा आपल्या जिवलग मित्राचा शोध घ्यायला सुरुवात केली, पण किती पाहिलं तरी तो काही दिसेना. अखेर त्याने एकसारखा आवाज करत बसलेल्या त्या बेडकांपैकी एकाला आपल्या मित्राबद्दल विचारायचं ठरवलं.

ते उडत उडत खाली आलं. एका बेडकाभोवती घिरट्या घालत त्याने विचारलं, 'तुम्हांला छोटा काळा टॅडपोल दिसला का हो कुठे, मी शोधतोय त्याला केव्हापासून!'



त्या छोट्या बेडकाने मान उंचावली आणि आश्चर्यानं फुलपाखराला विचारलं, 'तुम्ही तळ्यातल्या त्या छोट्या-काळ्या माशाबद्दल म्हणजे टॅडपोलबद्दल बोलताय का?'

फुलपाखरू उत्साहानं म्हणालं, 'हो-हो तो अगदी छोट्याशा माशासारखा दिसे....'

मग तो बेडूक मिस्कीलपणे हसत हसत म्हणाला, 'मलाही तुम्हांला एक प्रश्न विचारायचा आहे, एक पांढरा लठ्ठ सुरवंट पाहिला आहे का तुम्ही कुठे? तो सकाळपासून रात्रीपर्यंत एकसारखा पानं चरायचा आणि शेवटी तर तो एवढा लठ्ठ झाला होता की त्याला धड हालताही येत नव्हतं...'

फुलपाखराला काय बोलावं तेच सुचेना. हा बेडूक त्याच्याबद्दलच तर बोलत होता. मग त्याच्या लक्षात आलं, 'हा छोटा बेडूक म्हणजेच माझा मित्र, काळा मासा... मोठं झाल्यावर आपल्या सारखंच त्याचंही रूप बदललेलं दिसतंय.' आणि आनंदाने एकदम तो उद्गारला, 'माझ्या मित्रा, मी तुला ओळखलंच नाही!'



